**सिंहस्थ कुंभमेळा सन २०१५-१६ अंतर्गत सुधारित प्रशासकीय मान्यता: त्र्यंबकेश्वर येथील गोदावरी नदीवरील अस्तित्वातील घाटाची दुरुस्ती व नुतनीकरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१५/(प्र.क.३८५/२०१५/सिं.व्य.(महसूल),**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३ नोव्हेंबर, २०१६

वाचा :-

१) नगर विकास विभाग, महाराष्ट्र शासन यांचे पत्र क्र. कुंभमे/ २०१३ /प्र.क्र.२३/ न.वि.१६, दि.८.११.२०१३.
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक:सिंहस्थ-२०१३ / (प्र.क्र.१००/२०१४/ सिं.व्य.(महसूल), दि. ४.३.२०१४.
३) मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचे कार्यालयीन पत्र क्र. उमप्र/ तां. २.२/ ४२६२/ सन २०१५, दि. २९.७.२०१५.
४) नगर विकास विभाग ,मंत्रालय मुंबई यांचे पत्र क.कुंभमे-२०१३/प्र.क्र.२३ (नवि-१६)/नवि.-२५.दि.२६/९/२०१६

**प्रस्तावना :**

नाशिक व त्र्यंबक शहरात दर १२ वर्षांनी सिंहस्थ कुंभमेळा आयोजित करण्यात येतो. सन २०१५ या वर्षी जुलै महिन्यापासून कुंभमेळयास सुरुवात झाली. सन २०१५-१६ या वर्षातील सिंहस्थ कुंभमेळयाच्या अनुषंगाने वाढती भक्तसंख्या व पर्वणी स्थानाचे सुटसुटीत नियोजन करण्याच्या दृष्टीने संदर्भ क्रमांक १ अन्वये, मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या शिखर समितीच्या दि. १७.१०.२०१३ च्या बैठकीत सिंहस्थ कुंभमेळ्याच्या आराखडयास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर आराखडयाअंतर्गत जलसंपदा विभागाने रुपये १६९.७१ कोटीच्या कामांचे नियोजन करावयाचे होते. सदर आराखड्यां अंतर्गत संदर्भ क्र. २ अन्वये त्र्यंबकेश्वर येथील गोदावरी नदीवरील अस्तित्वातील घाटांची दुरुस्ती व नुतनीकरण करण्याच्या कामास रक्कम रु.८८.९२ लक्ष (कामाप्रित्यर्थ रू.८०.८३ लक्ष व अनुषंगिक खर्चासाठी रू.८.०८ लक्ष) प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि सदरची कामे करीत असताना क्षेत्रिय परिस्थितीनुसार व श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर देवस्थान यांच्या मागणीनुसार वाढीव कामे करणे आवश्यक ठरले, व त्यामुळे मूळ कामांमध्ये वाढ झालेली आहे. सदर वाढीव कामे करणे संयुक्तिक होते. तसेच वाढीव कामे मंदिर परिसरातील झाडे वाचविण्यासाठी व सिंहस्थ अंतर्गत येणाऱ्या भाविकांच्या सोयीसाठी करणे अत्यंत गरजेचे होते. त्या अनुषंगाने सदर वाढीव कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

त्र्यंबकेश्वर येथील गोदावरी नदीवरील अस्तिवातील घाटाची दुरुस्ती व नुतनीकरण या कामाप्रित्यर्थ रु. ११२.९६ लक्ष व अनुषंगिक खर्चासाठी रुपये ८.०८ लक्ष अशा एकूण रुपये १२१.०४ लक्ष (एकूण रुपये एकशे एकवीस लक्ष चार हजार फक्त) एवढ्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) सदर घाट दुरूस्तीचे काम पूर्ण झाल्यावर, त्र्यंबकेश्वर नगरपरिषदेने सदर घाट ताब्यात घेवून भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे.

ब) सदर कामावरील एकूण खर्च सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच होईल, असे नियोजन करावे.

या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष "४७११ पूर नियंत्रण प्रकल्पांवरील भांडवली खर्च, (०१) पूरनियंत्रण, १९०-सार्वजनिक बांधकाम क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) गोदावरी मराठवाडा विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७११-०२३६) " या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर सुधारित प्रशासकीय मान्यता आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१/का.१४३४ दि.२०/२/२०१६ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र९२/२०१६ दि.१९/३/२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या कामांस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता सिंव्य (महसूल) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ३, सन २०१६-१७ वर नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२४१०२२४९६९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yashavantrao K Bhadane

Digitally signed by Yashavantrao K Bhadane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Executive Engineer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao K Bhadane
Date: 2016.11.24 10:27:50 +05'30'

**(य.का.भदाणे)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. मा.अध्यक्ष /उपाध्यक्ष, विधान सभा, विधान भवन ,मुंबई.
३. मा.सभापती/उपसभापती , विधान परिषद विधान भवन,मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेते, विधान सभा, मुंबई यांचे कार्यालय , विधानभवन ,मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेते, विधान परिषद , मुंबई यांचे कार्यालय , विधानभवन ,मुंबई.
६. मा.मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
७. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
८. सर्व विधानसभा/ विधान परिषद सदस्य

९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०.प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११.प्रधान सचिव (जसंप्र व वि )यांचे स्वीय सहाय्यक , मंत्रालय,मुंबई
१२.सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक ,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
१३.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४.महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१५.कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१६.विभागीय आयुक्त,नाशिक विभाग, नाशिक
१७.मुख्य अभियंता (पा) व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
१८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
१९.जिल्हाधिकारी, नाशिक
२०.आंतरवित्त सल्लागार व उप सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
२१.उप सचिव (सिंव्य ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२२.अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण , नाशिक
२३.माहिती व जनसंपर्क महासंचनालय,मंत्रालय,मुंबई
२४.ग्रंथालय,विधानमंडळ सचिवालय, विधान भवन ,मुंबई
२५.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२६.वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
२७.सिंव्य (महसूल) कार्यासन संग्रहार्थ.